कोंकण विभागातील नायब तहसिलदार या संवर्गातील तदर्थ पदोन्नत्या नियमित करण्याबाबत (निवडसूची सन २०२३-२४).

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन आदेश क्रमांक पदोन्न-२०२३/प्र.क्र.२३२/ई-९**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक:-०१ ऑगस्ट, २०२४

१. विभागीय आयुक्त, कोकण, यांचे पत्र क. मशा/आस्था/कार्या-/ईएसबी/पदोन्नती/२०२३/१०२८७३७, दि.२१.११.२०२३
२. शासन आदेश क्र.२९.०१.२०२४

**शासन आदेश:-**

कोंकण विभागातील अव्वल कारकून व मंडळ अधिकारी या संवर्गातील खालील कर्मचाऱ्यांच्या सन २०२३-२४ या निवडसूची वर्षात विभागीय आयुक्त, कोंकण यांच्या अध्यक्षतेखालील विभागीय पदोन्नती समितीने दि.२०.११.२०२३ च्या बैठकीमध्ये केलेल्या शिफारशी व सामान्य प्रशासन विभागाने दिलेल्या सहमतीनुसार यापूर्वी वाचा क्र.२ येथील आदेशान्वये नायब तहसिलदार या संवर्गात दिलेल्या तदर्थ पदोन्नत्या, पदोन्नतींच्या कोट्यातील उपलब्ध नियमित पदावर नियमित करण्यात येत आहेत.

**१) मंडळ अधिकारी (०१)-**

| अ.क्र. | ज्येष्ठता क्र. | कर्मचाऱ्याचे नाव | जात प्रवर्ग |
|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ |
| १ | १२९ | श्री.व्ही.व्ही.मोरे | अ.ज. |

२. उपरोक्त नायब तहसिलदारांच्या तदर्थ पदोन्नती, पदोन्नतीच्या कोट्यातील उपलब्ध नियमित पदावर खालील अटींच्या अधीन राहून नियमित करण्यात येत आहे:-

१) मा. सर्वोच्च न्यायालयात दाखल केलेल्या विशेष अनुजा याचिका क. २८३०६/२०१७ च्या अधिन राहून पदोन्नतीच्या कोट्यातील खुल्या प्रवर्गातील रिक्त पदे दि.२५.०५.२००४ स्थित सेवाज्येष्ठतेनुसार निव्वळ तात्पुरत्या स्वरूपात भरण्याबाबत सा.प्र.वि/१६ कार्यासनाच्या दि.०७.०५.२०२१ च्या शासन निर्णयान्वये दिलेल्या सूचनांनुसार, तसेच दि.०७.०९.२०२१ च्या शासन निर्णयाप्रकरणी मा. उच्च न्यायालय, मुंबई येथे आव्हान देण्यात आलेले असून, त्यावरील अंतिम निर्णयाच्या अधीन राहून वरील नायब तहसिलदारांची तदर्थ पदोव्रती नियमित करण्यात येत आहे.

२) दिव्यांग कर्मचाऱ्यांना गट-अ व गट-ब पदांवर पदोन्नतीबाबत सा.प्र.वि/१६-अ यांनी दि.२०.०४.२०२३ रोजीच्या शासन निर्णयान्वये दिलेल्या सूचनांनुसार मान्यता देण्यात येत आहे.

३) सदर तदर्थ पदोन्नती निव्वळ तात्पुरत्या स्वरुपात नियमित करण्यात येत असल्याने उक्त अधिकाऱ्यांना नियमितपणाचा कोणताही हक्क असणार नाही.

४) निवडसूचीतील सर्व अधिकाऱ्यांनी सामान्य प्रशासन विभागाच्या दिनांक ०१ ऑगस्ट, २०१९ च्या शासन निर्णयात विहित केलेल्या पदोन्नतीच्या निकषांची पूर्तता केली आहे. या अटीच्या अधीन सदर निवडसूचीस मान्यता दर्शविण्यात येत आहे.

५) सदर तात्पुरत्या पदोन्नतीच्या अनुषंगाने पदस्थापनेचे आदेश प्राप्त झाल्यापासून संबंधित अधिकाऱ्यांची शासनाच्या पुर्व परवानगीशिवाय कोणत्याही प्रकारची रजा मंजूर करू नये,

६) तसेच भविष्यात न्यायालयीन अथवा पदोन्नतीच्या अनुषंगाने इतर काही आक्षेप निघाल्यास याची संपुर्ण जबाबदारी विभागीय आयुक्त, कोंकण विभाग, कोंकण या कार्यालयाची राहील.

३. सदरची पदोन्नती सामान्य प्रशासन विभागाच्या सहमतीने देण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२४०८०११९१७४०२३१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

SHRIKANT MADHUKAR MOHITE

Digitally signed by SHRIKANT MADHUKAR MOHITE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FORESTS DEPARTMENT, 2.5.4.20=5b514d2c3257bba976c5a2de42be8a635bba691c05d1f65ed0ead155a190e90e, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=5F152866E6FC64E39CF88B9CB27AE0169A65B000039B269233C42B5B77F06B31, cn=SHRIKANT MADHUKAR MOHITE
Date: 2024.08.01 19:34:05 +05'30'

**(श्रीकांत म. मोहिते)**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

विभागीय आयुक्त, कोंकण विभाग, कोकण.

**प्रत,**

१. मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई ३२.
२. मा. उपमुख्यमंत्री (गृह) यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई ३२
३. मा. उपमुख्यमंत्री (वित्त) यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई ३२
४ . मा. मंत्री (महसूल) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई ३२.
५. अपर मुख्य सचिव (महसूल) यांचे विशेष कार्य अधिकारी, मंत्रालय, मुंबई ३२.
६. संबंधित जिल्हाधिकारी,
७. प्रधान महालेखापाल, (लेखापरीक्षा व लेखा अनुज्ञेयता) मुंबई/नागपुर.
८. संबंधित जिल्हा कोषागार अधिकारी
९. संबंधीत अधिकारी (विभागीय आयुक्त, कोंकण विभाग, कोंकण यांच्यामार्फत).
१०. निवडनस्ती, कार्यासन ई-९, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.